**वस्त्रोद्योग धोरण २०११-२०१७ अंतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक -२०२०/प्र.क्र.२७१/टेक्स-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ मार्च, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-२०१२/प्र.क्र.२५७/टेक्स-२, दिनांक २१ फेब्रुवारी, २०१४
२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-२०१५/प्र.क्र.३६४/टेक्स-५, दिनांक १८/०४/२०१६
३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-२०१९/प्र.क्र.०१/टेक्स-५, दिनांक १६/०१/२०१९
४) वित्त विभाग, परीपत्रक, क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५
५) शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण -२०१६/प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा-५, दि. १० मे, २०१६
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०१/टेक्स-५, दि. ०४ डिसेंबर, २०१९
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक अर्थसं -२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दि.१३/०३/२०२०

**प्रस्तावना :-**

वरील संदर्भीय अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याच्या नवीन वस्त्रोद्योग धोरणांतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान योजनेच्या मार्गदर्शक सुचना विहित केल्या आहेत. सदर योजनेअंतर्गत या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्टा” मधील विवरणपत्रातील वस्त्रोद्योग घटकांना अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राज्यातील वस्त्रोद्योग धोरण अंतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान योजने अंतर्गत प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या बैठकीत मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांना या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्टा” मधील विवरणपत्रानुसार एकूण **रु.१२,२३,१५,०००/-** (अक्षरी रुपये बारा कोटी तेविस लाख पंधरा हजार रूपये) इतकी रक्कम भांडवली सवलतीपोटी मंजूर करुन वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तथापी सदर रक्कम संदर्भ क्रमांक ६ येथील शासन निर्णयान्वये गठीत दक्षता व नियंत्रण पथकाच्या तपासणी च्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे. ज्या प्रकल्पांची तपासणी दक्षता व नियंत्रण पथका कडून झाली नसेल त्यांची तपासणी लवकर करण्यात येईल.

२. सदरहू वस्त्रोद्योग घटकांना वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रक्कम योजनेच्या दिशानिर्देशानुसार या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बँकांच्या खात्यावर R.T.G.S./ NEFT द्वारे वितरीत करण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली व्याज सवलतीची रक्कम संबंधित बँकांनी या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्टा” मधील त्यांच्याशी संबंधित वस्त्रोद्योग घटकाच्या कर्ज खात्यात जमा करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेबसाइटवर ऑनलाईन सादर करावे.

४. वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम संबधित बँकेस वितरीत करण्याकरीता श्री.र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री. ब.बा.चव्हाण, सह सचिव(वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, (उपसचिव (Spinning Mills) V०००९) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन ती सोबतच्या परिशिष्टात नमुद केलेल्या बँकांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. यावर होणारा खर्च " मागणी क्रमांक व्ही-२, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२)(७८) राज्य वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान (कार्यक्रम) (३३, अर्थसहाय्य) (२८५१ ६५६५)" या लेखाशिर्षाखालीसन २०१९-२०२० या वित्तीय वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ७ येथील शासन निर्णयात दिलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने खर्च करण्यात येत आहे.

७. वित्त विभाग, शासन परीपत्रक, क्रमांक- अर्थसं -२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक १ एप्रिल,२०१९ महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक अन्वये, ३३ अर्थसहाय्य या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. सदर परीपत्रकातील लागू असलेल्या सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

८. वित्त विभाग, परीपत्रक, क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०/०५/२०१६ च्या परिशिष्ट-अ मधील अनु.क्र. १ ते ९ संदर्भातील तपासणी सुची मधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्दयांची पुर्तता होत आहे. सदर परीपत्रकानुसार परिशिष्ट-अ मधील अनु.क्र.१ ते ९ संदर्भातील माहीती खालील प्रमाणे आहे-

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार :-** वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ अन्वये ३३ अर्थसहाय्य या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परीपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

२) **मंजूर निधी :-** " मागणी क्रमांक व्ही-२, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२)(७८) राज्य वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान (कार्यक्रम) (३३, अर्थसहाय्य) (२८५१ ६५६५)" या लेखाशिर्षाखाली सुधारीत अंदाज सन २०१९-२०२० मध्ये या योजनेखाली रू.२५००.०० लक्ष

इतका निधी उपलब्ध आहे. त्यापैकी यापुर्वी रू. ३८२.६० लाख इतका निधी खर्च झाला आहे. त्यामुळे या योजनेखालील रू. २११७.४ लाख इतकी तरतूद शिल्लक आहे. त्यामधून रू.१२२३.१५ लक्ष निधी या शासन निर्णयाअन्वये वितरीत करण्यात येत आहे.

३) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- होय.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे, त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- या योजनेखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक त्याच लेखाशिर्षाखाली प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :- लागू नाही.

६) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- होय

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :- लागू नाही.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमीत करण्यापुर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत :- लागू नाही.

९) खरेदी विषयक प्रक्रीया अद्यावत संबंधीत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :-लागू नाही.

१०. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक अर्थसं -२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९ च्या सर्व अटी वशर्तीची पुर्तात होत आहे. तसेच या शासन निर्णया सोबतच्या परिशिष्टातील परि.९ नुसारची तपासणी सुची खालील प्रमाणे आहे.

१) योजनेस प्रशासकिय मान्यता - शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०१५/प्र.क्र.३६४/टेक्स-५, दिनांक १८/०४/२०१६ नुसार योजनेस प्रशासकिय मान्यता आहे.

२) निधी वितरण शासन निर्णयातील अटी व शर्तीची पुर्तता झाल्या नंतरच होणार आहे- शासन निर्णयातील अटी व शर्तीची पुर्तता होत आहे.

३) यापूर्वी वितरीत केलेल्या ७५ % निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र- संबंधित वस्त्रोद्योग घटकांना यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र घेण्यात आले आहे.

४) यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत:- सद्य:स्थितीत नाहीत.

५) निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होणार आहे :- सदर योजने अंतर्गत योजनेतील तरतुदीनूसार निधी बँकांच्या खात्यात जमा होऊन तदनंतर लाभार्थ्यांच्या खात्यात जमा केला जातो.

६) वस्तु खरेदी करण्यापुर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात आली असून त्याचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत, असे प्रमाणपत्र:-लागू नाही.

७) यामधून खरेदी करण्यापुर्वी खरेदी असल्यास प्रत्यक्ष वस्तु प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयके अदा केले जाणार आहे. :- लागू नाही.

८) आवश्यक त्या ठिकाणी आदीवासी सामाजिक न्याय यांची निधी वितरणास सहमती आहे :-लागू नाही.

९) प्रस्तूत योजनेत संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :-कुठलेही देयक प्रलंबित नाही.

१०) निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे - होय.

११. सदर शासन निर्णय, संदर्भिय अ.क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या संपन्न झालेल्या बैठकीत मंजूर वस्त्रोद्योग प्रकल्पांच्या दाव्यांना मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८१२५३१५६७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baliram Balu Chavhan

Digitally signed by Baliram Balu Chavhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e273e36b99be5b14489b31a9c2811b8b229d82eaf6b80e127184b883aeff30f8, serialNumber=d5d3bee863c8e1cd0b4387e83a935e72bfd969e5d5643a5a628f7516c192e220, cn=Baliram Balu Chavhan
Date: 2020.03.18 12:56:27 +05'30'

**( ब. बा. चव्हाण )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. अ.मु.स. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई(ई-मेलद्वारे)
६. अ.मु.स. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई(ई-मेलद्वारे)
७. सचिव (वस्त्रोद्योग), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.(ई-मेलद्वारे)
८. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.(ई-मेलद्वारे)
९. सह सचिव (वस्त्रोद्योग), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (१७-स), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (३ प्रती ), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई
१२. प्रवर्तक, परिशिष्टामधील वस्त्रोद्योग घटक (ई-मेल व्दारे)
१३. परिशिष्टामधील बँका (टफ सेल) (ई-मेल व्दारे)
१४. निवड नस्ती (टेक्स-५).

# दि. १७ मार्च, २०२० रोजीच्या शासन निर्णया सोबतचे "परिशिष्ट"

## Textile Policy 2011-2017

| Sr.No | Bank Name | Account Name | Account No | IFSC Code | Total Subsidy Amount Rs. In lakhs |
|---|---|---|---|---|---|
| 1 | HDFC Bank | FUNDS TO BE CLEARED - DOCUMENTARY SERVICES | 02400930000063 | HDFC0000240 | 419.74 |
| **Sr.No** | **UID No** | **Unit Name** | **Installment No** | **Subsidy Year** | **Subsidy Amount Rs. In lakhs** |
| 1 | NP/2019/10292 | G M SYNTEX PRIVATE LTD | 1 | 2017 | 30.53 |
| 2 | NP/2019/10292 | G M SYNTEX PRIVATE LTD | 2 | 2018 | 30.53 |
| 3 | NP/2019/10292 | G M SYNTEX PRIVATE LTD | 3 | 2019 | 30.53 |
| 4 | NP/2019/10301 | G M SYNTEX PRIVATE LTD | 1 | 2017 | 46.91 |
| 5 | NP/2019/10301 | G M SYNTEX PRIVATE LTD | 2 | 2018 | 46.91 |
| 6 | NP/2019/10301 | G M SYNTEX PRIVATE LTD | 3 | 2019 | 46.91 |
| 7 | NP/2019/10550 | DDECOR HOME FABRICS PRIVATE LIMITED | 1 | 2018 | 93.71 |
| 8 | NP/2019/10550 | DDECOR HOME FABRICS PRIVATE LIMITED | 2 | 2019 | 93.71 |
| | | | | **Total** | **419.74** |

| Sr.No | Bank Name | Account Name | Account No | IFSC Code | Total Subsidy Amount Rs. In lakhs |
|---|---|---|---|---|---|
| 2 | City Union Bank | Subsidy-Textiles (TUFS) | 122001000642037 | CIUB0000122 | **42.66** |
| **Sr.No** | **UID No** | **Unit Name** | **Installment No** | **Subsidy Year** | **Subsidy Amount Rs. In lakhs** |
| 1 | NP/2019/10085 | Radhagovind Sizers | 1 | 2017 | 14.22 |
| 2 | NP/2019/10085 | Radhagovind Sizers | 2 | 2018 | 14.22 |
| 3 | NP/2019/10085 | Radhagovind Sizers | 3 | 2019 | 14.22 |
| | | | | **Total** | **42.66** |

| Sr.No | Bank Name | Account Name | Account No | IFSC Code | Total Subsidy Amount Rs. In lakhs |
|---|---|---|---|---|---|
| 3 | CANARA BANK | NATIONAL COOPERATIVE DEVELOPMENT CORPORATION | 0346201000657 | CNRB0001445 | 165.71 |
| **Sr.No** | **UID No** | **Unit Name** | **Installment No** | **Subsidy Year** | **Subsidy Amount Rs. In lakhs** |
| 1 | NP/2019/10283 | Babasaheb Naik Kapus Utpadak Sahakari Soot Girni Limited | 1 | 2018 | 165.71 |

| Sr.No | UIDNo | UnitName | Installment No | Subsidy Year | Subsidy Amount Rs. In lakhs |
|---|---|---|---|---|---|
| 1 | CIIS/2017/10085 | LAXMNARAYAN SPINNERS INDIA PVT. LTD. | 1 | 2017 | 58.34 |
| 2 | | | | **Total** | **58.34** |

Textile Policy 2018-2023

| Sr.No | Bank Name | Account Name | Account No | IFSC Code | Total Subsidy Amount Rs. In lakhs |
|---|---|---|---|---|---|
| 1 | HDFC Bank | FUNDS TO BE CLEARED - DOCUMENTARY SERVICES | 02400930000063 | HDFC0000240 | 400.57 |
| **Sr.No** | **UID No** | **Unit Name** | **Installment No** | **Subsidy Year** | **Subsidy Amount Rs. In lakhs** |
| 1 | NP/2019/10314 | D'DECOR HOME FABRICS PRIVATE LIMITED | 1 | 2019 | 400.57 |
| **Sr.No** | **Bank Name** | **Account Name** | **Account No** | **IFSC Code** | **Total Subsidy Amount Rs. In lakhs** |
| 1 | State Bank of India | Subsidy Inward Remit-NEFT/RTGS Account | 4897932116886 | SBIN0011688 | 136.13 |
| **Sr.No** | **UID No** | **Unit Name** | **Installment No** | **Subsidy Year** | **Subsidy Amount Rs. In lakhs** |
| 1 | NP/2019/10242 | Sri Bhagirath Textiles Limited | 1 | 2018 | 136.13 |

**Total Subsidy Amount Rs. In Lakhs: 1223.15**